**दर्जेदार मराठी चित्रपट निर्मितीसाठी प्रोत्साहन देण्याकरीता अर्थसहाय्य मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : मचिअ-२०२३/प्र.क्र.१०१/सां.का.१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १५ मार्च, २०२४

वाचा : १) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र.मचिअ-२०१२/प्र.क्र.१४१/ सां.का.१, दि.३०.१०.२०१३
२) शासन निर्णय,पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्रमांक मचिअ-२०२३/ प्र.क्र.६४/सां.का.१, दि.२०.१०.२०२३
३) महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित यांचे क्र.ज.वि./द.म.चि.नि.उ/२०२२/४४७, दि.२०.०७.२०२३.

**प्रस्तावना:**

उपर्निर्दिष्ट दि.३०.१०.२०१३ च्या शासन निर्णयान्वये दर्जेदार मराठी चित्रपट निर्मितीसाठी प्रोत्साहन देण्याकरीता अर्थसहाय्य केले जाते. प्रस्तुत प्रकरणी एकूण ९३ चित्रपटांपैकी २५ चित्रपटांना सन २०२३-२४ या वित्तीय वर्षात रु.१०.०० कोटी इतक्या उपलब्ध निधीपैकी रु.८.५५ कोटी इतका निधी महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, गोरेगाव, मुंबई यांना उपलब्ध करुन दिलेला आहे. उर्वरित निधी महामंडळाने त्यांच्याकडील निधीमधून खर्च केला असून, उर्वरित रु.२२.६७ इतकी अनुदानापोटी द्यावयाची रक्कम त्यांना परत करावयाची आहे. सद्य:स्थितीत रु.१.४५ कोटी इतका निधी उपलब्ध असून, सदरचे अनुदान महामंडळास देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासननिर्णय:**

दर्जेदार मराठी चित्रपट निर्मितीसाठी प्रोत्साहन योजनेंतर्गत एकूण ९३ चित्रपटांपैकी २५ चित्रपटांना रु.८.५५ कोटी इतका निधी महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, गोरेगाव, मुंबई यांना उपलब्ध करुन देण्यात आला आहे. सद्य:स्थितीत उपलब्ध असलेल्या अर्थसंकल्पिय तरतूदीतून रु.१,४५,००,०००/- (रुपये एक कोटी पंचेचाळीस लक्ष फक्त) इतक्या रकमेचे अनुदान खालील चित्रपटांना वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

**परिशिष्ट-अ**

| क्र. | चित्रपट संस्थेचे नांव | चित्रपटाचे नांव | दर्जा | दर्जानुसार अर्थ सहाय्याची रक्कम (लक्ष) | प्रत्यक्षात देय रक्कम (लक्ष) |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| ३० | मे.ग्लोबल स्पोर्टस एंटरटेनमेंट ॲण्ड मीडिया सोल्युशन्स प्रा.लि. | मोगरा फुलला | ब | ३०.०० | २९.०० |
| ३१ | मे.कांतानंद प्रोडक्शन | खिचिक | ब | ३०.०० | २९.०० |
| ३२ | मे.लेटेरल वर्क्स प्रा.लि. | सावट | ब | ३०.०० | २९.०० |
| ३३ | मे.जे.एन.पी.फिल्म | आरॉन | ब | ३०.०० | २९.०० |
| ३४ | मे.ओम छांगणी फिल्म | प्रवास | ब | ३०.०० | २९.०० |
| एकूण | | | | **१ कोटी ५० लक्ष** | **१ कोटी ४५ लक्ष** |

२. या प्रयोजनार्थ वितरीत निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र या विभागास सादर करणे बंधनकारक राहील. यासाठी उप सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून अवर सचिव (रोख शाखा), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहेत. त्यांनी व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ दादासाहेब फाळके चित्रनगरी गोरेगांव मुंबई यांना सदर रक्कम एकरकमी त्वरीत वितरीत करावी.

३. यासाठी होणारा खर्च "मागणी क्रमांक झेडडी-२, २२०५ कला व संस्कृती (००) १०२, कला संस्कृती प्रचालन (०३) (०७) मराठी चित्रपट निर्मितीसाठी सहायक अनुदान (२२०५ १५९९) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या आर्थिक वर्षातील उपलब्ध निधीमधून भागविण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

४. सदर खर्चास उपर्निर्दिष्ट दि.३०.१०.२०१३ च्या शासन निर्णयान्वये प्राप्त अधिकारानुसार मंजूरी देण्यात येत आहे. तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३ दि.१२ एप्रिल, २०२३ मधील परिच्छेद ०७ व परिशिष्टातील अ.क्र.९ मधील तपासणी सूचीतील क्र.१,२,३,४,५,९ व १० ची पूर्तता होत असून उर्वरीत परिच्छेद व परिशिष्टातील अटी सदर प्रकरणी लागू होत नाहीत.

५. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने आणि वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३७८/२०२३/व्यय-१५, दि.०१.०८.२०२३ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक क्रमांक २०२४०३१५११२५४१३७२३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GOPICHAND PANDURANG CHAVAN

Digitally signed by GOPICHAND PANDURANG CHAVAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL DEPARTMENT, 2.5.4.20=2f36b6412b2bad225b8d078a7f80eed5b7d004f917946ac3d5ff416ac9473d48, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0E195B995C4CFBA1B7E199D1B4B48F8A7C4C1AAD3E82FED8E020632824893159, cn=GOPICHAND PANDURANG CHAVAN
Date: 2024.03.16 09:21:25 +05'30'

**( गो. पां. चव्हाण )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, दादासाहेब फाळके चित्रनगरी,गोरेगांव (पूर्व) मुंबई- ४०००६५.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
३. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
५. महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
८. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
९. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. अवर सचिव (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई - (यांना उक्त अनुदानाची रक्कम BDS व्दारे उपलब्ध करुन देण्यासंदर्भातील कार्यवाहीसाठी अग्रेषित
११. कक्ष अधिकारी (रोख शाखा), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती (सां.का.१)